## बोडणा विषयी माहिती

१ बोडण भरणे ही प्रथा फक्त कोकणस्थांमध्येच आहे.
त्याच्याही विविध पध्दति आहेत.

२ प्रतिवर्षी किंवा ३ वर्षांनी बोडण भरणे

३ मुंज लग्न निमित्ताने, घरात मुलगी मुलगा जन्मला तर बोडण भरणे.

४ घरात बोडणाची प्रथा नसली तरीही बोडणाला सुवासिनी किंवा कुमारिका म्हणून बोलावल्यास जाणे.

५ जातांना पंचामृत नेणे.

६ एक किंवा दोन वर्षांची किंवा आणखीनही बोडणे भरावयाची राहिली असल्यास फक्त एकच बोडण भरणे. व अन्य बोडणासाठी फक्त तेवढया सुवासिनी व कुमारिका भोजनास बोलावणे.

७ बोडणासाठी सुवासिनी व कुमारिका कोकणस्थच असाव्यात.

८ प्रत्येक बोडणासाठी एक घरची व ३ बाहेरच्या सुवासिनी व १ कुमारिका या प्रमाणे एकूण ४ सुवासिनी व एक कुमारिका असा संच असावा. कुमारिका तीन ते नऊ वर्षांची असावी.

९ आई सुवसिनी व तिची मुलगी कुमारिका चालत नाही.
कुमारिका व तिची आजी चालते.

१० बोडणाला जाणाऱ्या सुवासिनींनी व कुमारिकेने. त्या दिवशी डोक्यावरुन स्नान करावे. सुवासिनींनी नथ घालावी. सोन्याच्या बांगडीसह हातात कांचेच्या बांगडयाही असव्यात. कुमारिकेने गळयात अलंकार घालावा. बांगडयाही घालाव्यात.

११ चातुर्मासात (आषाढ शुध्द एकादशी ते कार्तिक पौर्णिमेपर्यंत.)
तसेच चैत्र, पौष व अधिकमास या कालावधीत बोडण भरु नये.

१२ आपल्या घरात सून, चुलत सून किंवा जाऊ गरोदर असेल तर बाळंतीण होऊन दीड महिना झाल्यावर बोडण भरावे.

**बोडणाची तयाची. साहित्य**

(सकाळी १० वाजेपर्यांत खालील साहित्य बोडण भरावयाच्या जागेवर आणून ठेवावे.)

हळद, कुंकू, रांगोळी, गुलाल, उदबत्ती, नीरांजन, तुपाच्या १० वाती, काडयापेटी, सुवासिक फुले, दूर्वा, विडयाची पाने चार, सुपाऱ्या तीन, कापूर पांच/सहा वडया. वाटीभर कोरडे तांदूळ, गुळ, खोबरे, १ मोठा पाट, आसने ५, कल्हई न लावलेली एक मोठी पितळी परात, पूजेसाठी पंचामृत, (दूध, दही, तूप, मध, साखर.) तसेच मोठया पांच वाटयांत स्वतंत्र पंचामृत ठेवणे. एका वाटीत दूध, कणीक भिजवतांना थोडी हळद घालून त्या कणकेची लेणी (अलंकार) व पांच दिवे तयार करुन त्या दिव्यात तूप वात घालून ठेवणे. तसेच दिव्यांना हळद कुंकू लावून ठेवणे. नैवेद्यासाठी पांच लहान आणि ३ मोठी केळीची पाने, पाणी भरलेला तांब्या, ताम्हन, पळी, भांडे. सर्व स्वयंपाक खीर, पुरण, पापड, कुरडई, वडे, घारगे, किंवा आवडीचे पक्वांन्न ११ वजेपर्यंत तयार असावे. अंगात येणारी सुवासिनी बोडण भरण्यासाठी मिळाली तर अधिक उत्तम.

**बोडणाची मांडणी**

सकाळी ११ वाजेपर्यंत खालील प्रमाणे मांडणी करुन ठेवावी.

ज्या ठिकाणी बोडण भरावयाचे असेल तेथे बोडणाची खास रांगोळी काढावी. त्यावर हळद कुंकू घालावे. रांगोळीवर मोठा पाट ठेवून त्यावर परात ठेवावी. त्या परातीत मध्यभागी चिमूटभर तांदूळ ठेवून कणकेच्या पाटयाचे टोक पश्चिमेकडे करावे. विरुध्द दिशेला लोड ठेवावा. पाटाच्या सभोवती पांच आसने मांडून ठेवावीत. घरच्या सुवासिनीने पूर्वेकडे तोंड करुन पूजेस बसावे. आपल्या समोर तांब्या ताम्हन पळी भांडे ठेवावे. स्वतःच्या उजव्याहाताजवळ कुमारिकेला बसवावे. सोई प्रमाणे गणेशपूजेसाठी तांदूळावर सुपारी ठेवावी. पांच लहान नैवेद्य व तीन मोठे नैवेद्य वाढून ठेवावेत.

त्या नंतर सुवासिनी व कुमारिका यांना मुख्य दाराच्या बाहेर उबरठया बाहेर उभे राहाण्यास सांगावे. घरच्या सुवासिनीने सर्वांच्या

पायावर दूध पाणी वाहावे. हळद, कुंकू लावून औक्षण करावे. (ओवाळावे) व घरात येण्यास सांगून बोडणाच्या तयारीजवळ आसनावर बसावयास सांगावे.

घरच्या सुवासिनीने देवातील अन्नपूर्णा आणून ताम्हनात ठेवावी.

नंतर प्रथम परातीतच किंवा पाटावर तांदुळावर सुपारी ठेवून तिची गणपती म्हणून पूजा करावी. स्नान, गंध, अक्षता, हळद, कुंकू, फुले, दूर्वा वाहून उदबत्ती, नीरांजन दाखवून नमस्कार करावा. नंतर गुळखोबऱ्याचा नैवेद्य दाखवावा. विडा दक्षिणा ठेऊन अक्षता वाहून प्रार्थना करावी. व नमस्कार करावा.

त्या नंतर देवीला स्नान, पंचामृत गरम पाण्याचे स्नान, गंध, अक्षता, हळद, कुंकू, फुले वाहून उदबत्ती, नीरांजन ओवाळावे. नमस्कार करावा. नंतर अत्तर लावून कोमट पाण्याने स्नान घालून देवी पुसुन परातीत असलेल्या पाटयावर आपल्याकडे तोंड करुन ठेवावी.

बोडणाच्या सुवासिनींनी व कुमारिकेने देवीची पूजा करावी. गूळ खोबऱ्याचा नैवेद्य दाखवून विडा दक्षिणा ठेवून अक्षता वाहाव्यात. प्रार्थना करुन नमस्कार करावा. त्या नंतर देवीला लेणी वाहून गंध, अक्षता, हळद, कुंकू, सुवासिक फुले, वाहावीत, उदबत्ती नीरांजन ओवाळावे.

तीन मोठया नैवेद्या पैकी घरच्या बाईने एक नैवेद्य देवीला व एक गाईला दाखवावा व एक घरातल्या देवाला. परातीत असलेले अन्य नैवेद्य सुवासिनींनी व कुमारिकेने देवीला दाखवावे. विडा दक्षिणा परातीतच ठेवून पाणी वाहावे. सर्वांनी फुले वाहून नमस्कार करावा. नंतर पिठाचे दिवे लावून त्यांना हळद कुंकू वाहावे व गणपति, देवी, व बोडणाची आरती करुन ते दिवे परातीतच ठेवावेत देवीला घरातील सर्वांनी नमस्कार करावा. त्या नंतर सर्व सुवासिनी व कुमारिकेने परातीत ओंजळ धरावी घरातील अन्य सुवासिनींने पळीला सोन्याची साखळी गुंडाळून त्या पळीने अगोदर देवीला, व नंतर कुमारिकेच्या व सुवासिनींच्या ओंजळीत दूध, दही, तूप, मध, साखर, वाहावे.

**त्या नंतर सर्वांनी बोडण कालवण्यास आरंभ करावा.**

घरातल्या अन्य सुवासिनींनी देवीला हळद कुंकू वाहावे. व बोडण कालवणाऱ्यांना लावावे. घरातील सर्वांनी देवीला व सुवासिनींना नमस्कार करावा. नंतर बोडणाला आलेल्या सुवासिनींनी आणलेले पंचामृत अन्य सुवासिनींनी देवीला वाहावे.

पांच दहा मिनिटानी अंगात येणाऱ्या सुवासिनीला/कुमारिकेला "तुला काय हवे, तू तृप्त आहेस का? असे विचारुन जे हवे असेल ते (पंचामृतापैकी) हातावर द्यावे.

ह्या सर्ववेळी बाकीच्या सर्व सुवासिनींनी बोडण कालवतच राहावयाचे आहे, व ती कुमारिका काही नको असे म्हणाली तरी दूध, दही बोडणातल्या देवीला वाहावे. त्या नंतर दोन तीन मिनिटांनी बोडण पूर्ण कालवून झाल्यावर बोडणातील थोडेसे कालवणच काढून ठेवावे. व भोजना पूर्वी घरातील सर्वांनी अंगारा म्हणून ते लावावे.

घरातील सुवासिनीने बोडणाला बसलेल्या सर्वांच्या हातावर पुरण द्यावे त्यानी हातातील पुरणानेच हात स्वच्छ करावेत व थोडया पाण्याने हात धुऊन नंतर हात धुण्याच्या जागी हात धुवावेत. देवी स्वच्छ करुन तिच्या तोंडाला साखर लावून देवी देवघरात ठेवावी. बोडण कालवलेली परात एका बाजूला ठेवून भोजनाची पाने वाढावी. सर्वांचे भोजन झाल्यावर कुमारिकेसह सर्वांची ओटी भरावी. अत्तर लावून निरोप द्यावा.

कालवलेले बोडण सूर्यास्तापूर्वी गाईला द्यावे.

बोडणाच्या रांगोळ्या पान नंबर ५ वर दिल्या आहेत त्यापैकी कोणतीही एक रांगोळी काढावी. कृती व माहिती रांगोळीच्या आकृतीसह

सौ. ललिता विश्वनाथ वैशंपायन
मालाड (प) मुंबई - ४०००६४

# बोडणाच्या रांगोळ्या











# श्री, आरती बोडणाची

उग्र तुझे रूप तुझे तेज किती ।
शशी सुधासम असे तव कांती ।।
अष्टभुजा आयुधे हाती ।।
करिसी रिपु संहार भक्त वंदीती ।
जयदेवी जयदेवी कुलस्वामिनी ।।
आम्ही वहु अपराधी आलो तव चरणी ।।१।।

पंचामृती तुज घालुनी स्नानं ।।
सर्व अलंकार सर्व भूषण ।।
नीलवर्ण वस्त्र करिसी परिधान ।।
अंवे व्याघ्र आवडे वाहन ।।
जयदेवी जयदेवी जय कुलस्वामिनी । आम्ही ।।२।।

नाकी तुझ्या नथ पायी पैंजण ।।
जय जननी शक्ती आदि माया पूर्ण ।।
धूपदीप कर्पुर करू आरतीला ।।
पंचपक्वान्नांचा नैवेद्य तुला । जयदेवी ।।३।।